सन २०२१-२२ करीता, घर बांधणी अग्रिम
अंतर्गत सुधारित अंदाजाच्या मर्यादेत
अनुदान वितरीत करणेबाबत (अनिवार्य)

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कृषिवि-३७२२/प्र.क्र.३३/७अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०२२.

वाचा :- १. नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांचे पत्र
क्र. मफुकृवि/लेखा-२/९०४ /२०२१, दि.२१.०३.२०२२.
२. नियंत्रक, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली यांचे पत्र
क्र. डॉ.बासाकोकृवि/लेखा-३/गृह.अ/६१८/२१, दि.२१.०३.२०२२.

**शासन निर्णय :-**

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता, ६२१६- गृहनिर्माणासाठी कर्जे, ८०-सर्वसाधारण, ८०० इतर कर्जे, (००)(०१) कृषि विद्यापीठांच्या कर्मचाऱ्यांना घर बांधणी अग्रीम (अनिवार्य) ६२१६ ०२०१, ५५- कर्जे व आगाऊ रकमा करीता सुधारित अंदाजांतर्गत मंजूर केलेले रु. ५७,३२,००० (अक्षरी रुपये सत्तावन्न लाख, बत्तीस हजार फक्त) अनुदान महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी व डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली यांना वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे.

(रु. लाखात)

| अ. क्र. | लेखाशीर्ष (अनिवार्य) | कृषि विद्यापीठे | सन २०२१-२२ करीता सुधारीत तरतूद | आतापर्यंत वितरीत निधी | विद्यापीठा कडून प्रस्तावित मागणी | विभागाकडून प्रस्तावीत मागणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | मागणी क्र.डी-११, ६२१६- गृहनिर्माणासाठी कर्जे, ८०-सर्वसाधारण, ८०० इतर कर्जे,(००)(०१) कृषि विद्यापीठांच्या कर्मचाऱ्यांना घर बांधणी अग्रीम (अनिवार्य) ६२१६ ०२०१, ५५- कर्जे व आगाऊ रकमा | म. फु. कृषि विद्यापीठ, राहुरी | ५७.३२ | ०.०० | ७०.०० | **११.४३** |
| | | डॉ.बा.सा. को. कृषि विद्यापीठ, दापोली | | ०.०० | २८०.९५ | **४५.८९** |
| | **एकूण** | | **५७.३२** | **०.००** | **३५०.९५** | **५७.३२** |

२. सदरचे निधी वितरण खालील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून शासन मंजुरी देत आहे.

१) कृषि विद्यापीठांनी उपलेखाशिर्ष / गट / योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील जी पदे / बाबी, योजनेतर योजना म्हणून पुढे चालू ठेवण्यास शासनाने मान्यता दिली आहे, त्या पदांचे वेतन व भत्ते आणि अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा.

२) उपलेखाशिर्षनिहाय, गटनिहाय, योजनानिहाय व बाबनिहाय वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी

शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

३) उपलेखाशिर्षनिहाय मंजूर योजनांचे व त्या अंतर्गत मंजूर असलेल्या पदांचे सुधारित आकृतीबंधानुसार व्यवस्थितरित्या गटनिहाय वर्गीकरण केले आहे किंवा कसे याची विद्यापीठाने सखोल तपासणी करावी. सदर वर्गीकरणामध्ये शासनाच्या मान्यतेशिवाय कोणतेही बदल करु नयेत.

४) प्रत्येक गटामधील वितरीत केलेले सहाय्यक अन महसूली उत्पन्न त्या गटातील अनुज्ञेय बाबींवरील खर्च भागविण्यासाठी आणि विकास कामे करण्यासाठी उपयोगात आणावे. एका गटाचे सहायक अनुदान आणि महसूली उत्पन्न दुस-या गटातील योजनां / बाबींसाठी वर्ग करु नये.

५) शासनाने मंजूर केलेल्या पदांपैकी जी पदे महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३ आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९० मधील तरतूदीप्रमाणे भरलेली आहेत व सदर पदे योजनेतर खर्चाने पुढे चालू ठेवण्यासाठी शासनाने मान्यता दिली आहे, अशा पदांच्या वेतन व भत्त्यांसाठीच विहीत अनुदान देय राहील.

६) प्रत्येक उपलेखाशीर्ष / गट/योजना आणि बाब निहाय स्वतंत्र लेखे / हिशोब ठेवावेत.

७) ज्या योजनांतर्गत / योजनेतर योजनांचा कालावधी संपलेला आहे, अशा योजना संबंधित कालावधीनंतर शासनाची मान्यता मिळाल्याशिवाय योजनेतर/योजनांतर्गत खर्चाने पुढे चालू ठेऊ नयेत.

८) कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

९) शासनाने विद्यापीठाच्या काही नवीन योजनांना मान्यता देताना, सदर योजनेमधील पदे अंतर्गत समायोजनाने उपलब्ध करण्यास/भरण्यास मान्यता दिलेली आहे. यामुळे सदर नवीन योजनेसाठी नवीन पदे निर्माण झाल्यामुळे, ज्या योजनेतर / योजनांतर्गत मूळ योजनांमधील पदे अंतर्गत समायोजनाने नवीन योजनेकरिता वर्ग / उपलब्ध केली असतील, त्या मूळ योजनांमधील पदांचे वेतन व भत्यासाठी या आदेशान्वये वितरीत केलेला निधी खर्च करु नये.

१०) कृषि विद्यापीठांना त्यांचे महसूली उत्पन्न वापरण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. याबाबत विद्यापीठाने विहीत आदेश आणि कार्यपध्दतीनुसार उचित कार्यवाही करावी. तसेच महसूली उत्पन्न वाढविण्याच्या योजना राबविण्याबाबत कार्यवाही करावी.

११) विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

१२) नियमबाह्य योजना पदे आणि बाबींसाठी खर्च करु नये.

३. विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तीचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

४. उपविभागीय कृषि अधिकारी, राहुरी, जि. अहमदनगर व उपविभागीय कृषि अधिकारी, दापोली, जि.रत्नागिरी या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान शासन निर्णय क्रमांक कृषि व सहकार विभाग क्रमांक अेजीयु-१०७२/१८४७१/व्ही, दिनांक २७ सप्टेंबर १९७२ आणि शासन निर्णय क्रमांक कृषिवि- २००३/सीआर-३५/२०-अे, दिनांक २५/४/२००३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे कृषि विद्यापीठाचे नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

५. या प्रित्यर्थचा खर्च सन २०२१-२२ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

६. सदरचा शासन हा महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२ व १४४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार तसेच वित्त विभागाचा अनौ. संदर्भ क्र. ११०/२०२२/व्यय-१, दि. २८.३.२०२२ सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०३३१२१००२०३७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VARSHA M MEHER

Digitally signed by VARSHA M MEHER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=15c7ee448037873e9a798068206bca7a76131bdca6b4660721edcffa24f13d02, pseudonym=DF028EC074B9701EF79AA9C9DDE9252E3743EE7A, serialNumber=32E5D5F3AC71BC2B5E34B484CA757B21FC3E12CE30CAE2D0F913FE77E2B06737, cn=VARSHA M MEHER
Date: 2022.03.31 21:04:07 +05'30'

**( वर्षा मेहेर )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) सदस्य सचिव तथा महासंचालक / सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,

२) कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी

३) कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली,
४) उपविभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर जिल्हा अहमदनगर,
५) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई ,
६) जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर / उपकोषागार अधिकारी, राहुरी जिल्हा अहमदनगर,
७) जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी / उपकोषागार अधिकारी, दापोली,
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
९) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१०) उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
११) वित्त विभाग (व्यय १/ बियुडी १३), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१२) नियोजन विभाग (कार्यासन १४३१), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१३) कक्ष अधिकारी/ अवर सचिव, कार्यासन २अे / ६अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२,
१४) कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.